परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांकः परिवि-२०१९/ प्र.क्र.(१०५/१९)/तांशि-१**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक:- २० नोव्हेंबर, २०१९**

**संदर्भ :-१.** शासन निर्णय,उच्च व तंत्र शिक्षण विभाग, एससीटी-६५१२/१३२/१२/तांशि-१, दि.०३.०८.२०१६
**२.** शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दि.२९.०२.२०१६
**३.** संचालक, तंत्रशिक्षण यांचे पत्र क्र. ४/आस्था/परिविक्षा/२०१९/६८३, दि.०१.१०.२०१९

**शासन आदेश :-**

उपरोक्त संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयान्वये खाली नमूद अध्यापकांची सहयोगी प्राध्यापक, औषधनिर्माणशास्त्र, शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालयीन शिक्षक सेवा, गट-अ या पदावर दोन वर्षांच्या परिविक्षाधीन कालावधीकरीता नियुक्ती करण्यात आली आहे. सदरचा कालावधी पूर्ण झाल्याने संबंधित अध्यापकांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये प्राप्त झाला आहे.

२. शासन सेवेतील अधिकारी/कर्मचारी यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यासंदर्भातील संदर्भाधीन क्र. २ येथील शासन निर्णयातील अटींची पूर्तता प्रस्तुत प्रकरणी होत असल्याने खाली नमूद अध्यापकांचा परिविक्षाधीन कालावधी स्तंभ ०५ मध्ये नमूद दिनांकास समाप्त करण्यात येत आहे. तसेच त्यांची सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक स्तंभ ०६ मध्ये नमूद करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अध्यापकाचे नाव व कार्यरत संस्था | रुजू दिनांक | परिविक्षाधीन कालावधीत घेतलेल्या रजा (परिवर्तित /अर्जित) | परिविक्षाधीन कालावधी समाप्तीचा दिनांक | सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १. | डॉ. राजेश भास्कर नवले, सहयोगी प्राध्यापक, औषधनिर्माणशास्त्र, शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालयीन शिक्षक सेवा, गट-अ | ०४/०८/२०१६ (म.पू.) | निरंक | ०३/०८/२०१८ (म.नं.) | ०४/०८/२०१८ (म.पू.) |
| २. | डॉ. प्रशांत बाबाराव शामकुवर, सहयोगी प्राध्यापक, औषधनिर्माणशास्त्र, शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालयीन शिक्षक सेवा, गट-अ | १२/०८/२०१६ (म.पू.) | निरंक | ११/०८/२०१८ (म.नं.) | १२/०८/२०१८ (म.पू.) |
| ३. | डॉ. परेश रमेश महापरळे, सहयोगी प्राध्यापक, औषधनिर्माणशास्त्र, शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालयीन शिक्षक सेवा, गट-अ | २६/०८/२०१६ (म.पू.) | निरंक | २५/०८/२०१८ (म.नं.) | २६/०८/२०१८ (म.पू.) |

३. संबंधित संस्था प्रमुखांनी उक्त अध्यापकाच्या पुढील वेतनवाढी मुक्त करण्याच्या अनुषंगाने उचित कार्यवाही तातडीने करावी.

४. सदर शासन आदेश, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.परिवि-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दि.२९.०२.२०१६ मधील तरतुदींनुसार व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.परिवि/ २७१५/ प्र.क्र.२०३/ आठ, दि.२५.०८.२०१५ अन्वये प्रशासकीय विभाग प्रमुखास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९११२०१६४२११३३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sameer Laxman Dhere

Digitally signed by Sameer Laxman Dhere
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e6ab4a357b0e2247b4328b57f45f509bf1bf0bd20c865128a018421c354bddc5, serialNumber=6ee64cf9b42881125c3715a5db341b5827c5743c728bc85f04bb71ff8fc154d6, cn=Sameer Laxman Dhere
Date: 2019.11.20 16:44:51 +05'30'

**(समीर ढेरे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) सहसंचालक, तंत्रशिक्षण, विभागीय कार्यालय, औरंगाबाद .
३) प्राचार्य, शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय, औरंगाबाद.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद.
६) संबंधित अध्यापक (प्राचार्यामार्फत)
७) सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
८) निवडनस्ती (तांशि-१)